**मुंबई महानगर प्रदेशाकरीता एकात्मिक बस वाहतूक आराखडा (Integrated Bus Transportation) तयार करण्याबाबत कार्यगट (Task Force) स्थापन करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२५/प्र.क्र.११०/नवि-७**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक : १० जून, २०२५.**

**पहा :-**

१. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.नितिआ-२०२३/प्र.क्र.२६/का.१४१२, दिनांक १० सप्टेंबर,२०२४.
२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.नितिआ-२०२३/प्र.क्र.२६/का.१४१२, दिनांक १० सप्टेंबर,२०२४.
३. नियोजन विभाग, शासन पत्र क्र.नितिआ-२०२३/प्र.क्र.२६/का.१४१२, दिनांक १६ मे, २०२५.

**प्रस्तावना :-**

नीति आयोगाने शहर-क्षेत्रांना 'ग्रोथ हब' (G-HUB) म्हणून विकसित करण्यासाठी संकल्पना पुढे आणली आहे. G-HUB नावाच्या या संकल्पनेद्वारे देशभरातील निवडक क्षेत्रांसाठी आर्थिक वाढीचे धोरण तयार करुन त्या धोरणाच्या अंमलबजावणीसाठी रोडमॅप तयार करण्यात येत आहे. सुरुवातीच्या टप्प्यात प्रायोगिक तत्त्वावर मुंबई महानगर प्रदेश क्षेत्र (महाराष्ट्र), सुरत (गुजरात), विशाखापट्टणम (आंध्र प्रदेश) आणि वाराणसी (उत्तर प्रदेश) या ४ शहरी क्षेत्रात ही संकल्पना राबविण्याचे निश्चित केले आहे. यामध्ये मुंबई महानगर प्रदेश क्षेत्र (महाराष्ट्र) ची पायलट सिटी-रिजन म्हणून निवड करण्यात आली आहे. त्यानुसार राज्याच्या आर्थिक विकासाला चालना देणाऱ्या शिफारशींच्या जलद अंमलबजावणीवर देखरेख करण्यासाठी, परदेशी गुंतवणूक आकर्षित करण्यासाठी आणि टिकवून ठेवण्यासाठी, स्टार्टअप व रोजगार क्षमतेला चालना देण्यासाठी मुंबई महानगर प्रदेश आर्थिक बृहत् आराखडा- ग्रोथ हब तयार करण्यात येत आहे.

मुंबई महानगर प्रदेश आर्थिक बृहत् आराखड्याचा आढावा घेण्यासाठी संदर्भाधीन क्र.१ येथील नियोजन विभागाच्या दि.१०/०९/२०२४ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समन्वय समिती गठीत करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र. २ येथील दि.१०/०९/२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुंबई महानगर प्रदेश आर्थिक बृहत् आराखड्यास अंतिम मान्यता देण्यासाठी तसेच या संकल्पनेच्या अंमलबजावणीसाठी ग्रोथ हब समन्वय समितीस मार्गदर्शन करण्याकरिता मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली ग्रोथ हब नियामक मंडळाची स्थापना करण्यात आली आहे.

मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली ग्रोथ हब नियामक मंडळाच्या दि.०७ एप्रिल, २०२५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये विविध मुद्द्यांच्या कार्यवाहीबाबत निर्देश (संदर्भ क्र.३) देण्यात आलेले आहेत. त्यामध्ये मुंबई महानगर प्रदेशाकरीता एकात्मिक बस वाहतूक आराखडा (Integrated Bus Transportation) तयार करण्याच्या अनुषंगाने कार्यगट (Task Force) स्थापन करण्याचे निर्देश देण्यात आलेले आहेत. त्यानुसार मुंबई महानगर प्रदेशाकरीता एकात्मिक बस वाहतूक आराखडा तयार करण्याच्या अनुषंगाने कार्यगट स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुंबई महानगर प्रदेशाकरीता एकात्मिक बस वाहतूक आराखडा (Integrated Bus Transportation) तयार करण्याच्या अनुषंगाने या शासन निर्णयाद्वारे कार्यगट (Task Force) स्थापन करण्यात येत आहे. सदर कार्यगटाची रचना व कार्यकक्षा खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

**(अ) कार्यगटाची रचना :-**

| अ.क्र | सदस्याचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई विद्युत पुरवठा व पविवहन लि.(बेस्ट), मुंबई. | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे | सदस्य |
| ३ | अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई | सदस्य |
| ४ | अतिरिक्त महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई. | सदस्य |
| ५ | आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, नवी मुंबई | सदस्य |
| ६ | आयुक्त, कल्याण-डोबिवली महानगरपालिका, कल्याण | सदस्य |
| ७ | आयुक्त, वसई-विरार महानगरपालिका, वसई-विरार | सदस्य |
| ८ | आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका, मिरा भाईंदर | सदस्य |
| ९ | आयुक्त, भिवंडी-निझामपूर महानगरपालिका, भिवंडी | सदस्य |
| १० | आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका, उल्हासनगर | सदस्य |
| ११ | आयुक्त, पनवेल महानगरपालिका, पनवेल | सदस्य |
| १२ | प्रमुख, दळणवळण व वाहतूक, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई | सदस्य सचिव |

**ब. सदर कार्यगटाची कार्यकक्षा (ToR) पुढीलप्रमाणे असेल :-**

१. मुंबई महानगर प्रदेशातील प्रवाशांना एकसंध (seamless) आणि प्रवासाकरिता एकच तिकिट (single ticket experience) अनुभव देण्यासाठी सर्व बस वाहतूक सेवाचे एकात्मिकरण करणे.
२. याकरिता कार्यगटाने मुंबई महानगर प्रदेशाकरीता एकात्मिक बस वाहतूक आराखडा तयार करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६१०१२२१४४४८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB5BBF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.06.10 12:22:40 +05'30'

**(विजय चौधरी)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
९. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड, मुंबई.
१०. महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई विद्युत पुरवठा व परीवहन लि., मुंबई.
११. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., नागपूर
१३. अतिरिक्त महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
१४. अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१५. आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, नवी मुंबई.
१६. आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, कल्याण.
१७. आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका, उल्हासनगर.
१८. आयुक्त, पनवेल महानगरपालिका, पनवेल
१९. आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका, मिरा भाईंदर.
२०. आयुक्त, भिवंडी-निझामपूर महानगरपालिका, भिवंडी.
२१. आयुक्त, वसई-विरार महानगरपालिका, वसई-विरार.
२२. मुंबई महानगर प्रदेशातील सर्व नगरपालिका
२३. सह सचिव (नवि-७/१०/२१/२३/२८), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. निवड नस्ती/२०२५ (नवि-७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.